**वेतनावरील खर्च नियंत्रित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०२ जून, २०१५

## शासन निर्णय

मा. राज्यपाल महोदयांनी दि. १२.११.२०१४ रोजी राज्य विधानमंडळाच्या अधिवेशनातील अभिभाषणात राज्याची आर्थिक स्थिती, राज्याची स्वीकृत दायित्वे, भविष्यातील वाटचाल आणि खर्च अधिक पारदर्शक व कार्यक्षमतेने करण्यासाठी आवश्यक उपाययोजना विषद करणारी श्वेत पत्रिका शासनाकडून काढण्यात येईल, असे स्पष्ट केले होते. त्यास अनुसरुन मार्च २०१५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात महाराष्ट्र राज्याच्या वित्तीय स्थितीबाबत श्वेत पत्रिका सादर करण्यात आली. या श्वेत पत्रिकेमध्ये (पृ.१० वर ) "दीर्घकालीन वित्तीय स्थैर्यासाठी वेतनवाढीवरील खर्चाचा सरासरी दर हा महसूली वाढीच्या सरासरी दरापेक्षा अधिक असता कामा नये, हे तत्व सर्वमान्य आहे." असे नमूद करण्यात आले आहे.

२. सन २०१५-१६ चे अर्थसंकल्पीय अंदाज सादर करतांना महसूल वाढीचा दर ९.६४ % इतका अपेक्षित धरण्यात आला आहे. हा महसूल वाढीव दर लक्षात घेता, दिर्घकालीन वित्तीय स्थैर्यासाठी वेतनवाढीचा सरासरी दर हा महसूल वाढीच्या सरासरी दरापेक्षा अधिक असता कामा नये, हे सर्वमान्य तत्व पाळणे आवश्यक आहे. तसेच दि. १.१.२०१६ पासून सातव्या वेतन आयोगाच्या अपेक्षित शिफारशीमुळे वेतनावरील खर्चात मोठी वाढ संभवते. या सर्व बाबींचा विचार करुन नवीन पदनिर्मिती तसेच पदभरती यावर नियंत्रण आणावे किंवा कसे, ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

३. वरील पार्श्वभूमीवर शासन आता पुढील प्रमाणे निदेश देत आहे :-

अ) नवीन पदनिर्मिती हे आदेश निघाल्यापासून पूर्णपणे बंद राहील. मात्र, हे बंधन सिडको, MMRDA, PMRDA, NIT, NMRCL, MMRCL, PMRCL, यासारख्या आर्थिक सक्षम स्वायत्त संस्थांना तसेच केंद्र शासन पुरस्कृत (ज्या आस्थापनांचे पगार केंद्र शासनाच्या अनुदानातून होतात) संस्थांना लागू राहणार नाहीत.

ब) खालील "क" मध्ये नमूद केलेल्या संवर्गाव्यतिरिक्त इतर संवर्गातील सरळ सेवेच्या कोट्यातील रिक्त असणाऱ्या पदांपैकी ५०% किंवा एकूण संवर्गाच्या ४% यापैकी जे कमी असेल इतकीच पदे भरण्यात यावीत.

क) शिक्षक, पोलीस कॉन्स्टेबल, ग्राम सेवक, तलाठी, आरोग्य परिचारीका, पशुधन परीवेक्षक, मत्स्य व्यवसाय विभागाचे तालुका स्तरावरील अधिकारी, वन रक्षक, कृषी सहायक, पाटबंधारे विभागाचे कनिष्ठ अभियंता या संवर्गात एकुण रिक्त पदांपैकी ७५% पर्यंत पदे भरण्यास मुभा राहील.

ड) उर्वरीत पदे भरण्यासाठी अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांच्या अध्यक्षतेखाली समिती राहील. या समितीपुढे प्रस्ताव सादर करतांना विभागाने खात्यात सध्या वेतनावर होणारा खर्च व त्यात होणारी संभाव्य वाढ यांचा आढावा घेऊनच प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे.

४. प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरीत परिणाम न होता, विभागामध्ये एकूण उपलब्ध कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्याचे संपूर्ण अधिकार राहतील. विभागाच्या ज्या संवर्गाच्या बाबतीत कामांची आवश्यकता कमी झाली आहे, अशा संवर्गातील पदांची विभागातील तीच वेतनश्रेणी असलेल्या दुसऱ्या संवर्गात आवश्यकतेनुसार पदे स्थानांतरण करता येतील. तथापि त्या विभागांतर्गत एकूण पद संख्येच्या मर्यादेतच असे समायोजन राहील. जर पदे स्थानांतरण करावयाच्या संवर्गाची वेतनश्रेणी वेगळी असेल तर अशा स्थानांतरणास उपरोक्त समितीची मान्यता आवश्यक राहील.

वरीलप्रमाणे कार्यवाही अंती काही अधिकारी / कर्मचाऱ्यांचे समायोजन विभागाकडील पदांवर करता येत नसल्यास हा अतिरिक्त ठरणारा अधिकारी / कर्मचारी वृंद शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. असंक-१००१/प्र.क्र.२२/ २००१/वित्तीय सुधारणा, दि. १० सप्टेंबर, २००१ नुसार निर्गमित केलेल्या सूचनेनुसार वित्त विभागात कार्यरत असलेल्या अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे पदनिहाय व संवर्गनिहाय वर्ग करावा.

५. प्रशासकीय विभागाने वरील बाबींमुळे कामावर परिणाम होणार नाही, याकरीता ई-गव्र्हनन्स चा वापर करावा.

६. अनावश्यक खर्च कमी करणे, कमी मनुष्यबळाचा वापर करुन गुणवत्तेचे प्रशासन करणे, याचबरोबर कामाच्या गुणवत्तेवर परिणाम न करता खर्च १०-१५ % कमी करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालामध्ये त्याप्रमाणे नोंदी घेण्यात याव्यात.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१५३५००३९०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=All India Service, ou=Chief Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2015.06.02 16:32:15 +05'30'

(स्वा. शि. क्षत्रिय)
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) राज्यपालांचे सचिव.
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
४) सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
५) मंत्रालयीन सर्व विभाग.
६) मंत्रालयाच्या सर्व विभागांखाली विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
७) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
८) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१०) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

११) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१२) आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व).
१३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
१४) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
१५) राज्य महिला आयोग, वरळी, मुंबई.
१६) सर्व विभागीय आयुक्त.
१७) सर्व जिल्हाधिकारी.
१८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
१९) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
२०) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , मुंबई
२२) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
२३) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर
२४) सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नार्थ ब्लॉक, नवी दिल्ली.
२५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२८) जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब.
२९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३०) सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई / नागपूर / पुणे / औरंगाबाद.
३१) मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका.
३२) कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी / देहू रोड / देवळाली / अहमदनगर.
३३) कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर.
३४) कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
३५) कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
३६) कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ,अकोला.
३७) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
३८) कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे.
३९) कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर.
४०) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.
४१) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
४२) कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.
४३) कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
४४) कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.
४५) कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव.
४६) कुलसचिव, महाराष्ट्र पशू व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.

४७) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, रायगड
४८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई.
४९) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई.
५०) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
५१) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१.
५२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बॅरेक क्रमांक १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०.
५३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई-४.
५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३.
५५) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५.
५६) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-२१.
५७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई - २८.
५८) वित्त विभागातील सर्व कार्यासने.
५९) निवड नस्ती, वित्त विभाग (अर्थ-१)